Inductively Coupled Plasma Spectophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरणातील सुटे भाग खरेदी करण्यासाठीप्रशासकिय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१९/प्रक्र.२०२/आरोग्य-८**
नवीन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपाउंड,कॉम्प्लेक्स
बिल्डींग,१० वा मजला मुंबई -४००००१
दिनांक: २४.०४.२०२०

**वाचा :**

१) उपसंचालक, आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांचे पत्र क्रमांक, उसंआसे/रासाआप्र/भांडार-१२०/आयसीपी/८१४७/२०१९ दि.७.११.२०१९
२) उद्योग उर्जा व कामगार विभागाचे शासन निर्णय क्रमांक: भांखस-२०१४/प्र.क्र.-८२/भाग-२ उद्योग-४,दिनांक १.१२.२०१६
३) उपसंचालक, आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांचे पत्र क्रमांक - उसंआसे /रासाआप्र/भांडार-१२०/आयसीपी/देयक प्र.मा. / ८४६ / २०२० दि. १७.०२.२०२०.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांचे पत्र क्र.-उसंआसे / रासाआप्र / भांडार-१२० / आयसीपी / देयकप्र. मा. / १८४२-४६ /२०२०, दि.२३.०३.२०२०.

**प्रस्तावना :**

Inductively Coupled Plasma Spectophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरण दुरुस्तीसाठी आरोग्य सेवा संचालनालयाने मे.लॅब इंडिया ॲनालिटीकल प्रा.लि.मुंबई यांचेकडून ASY VLA PROP ०-२ LPM WICN हे दोन सुटे भाग खरेदी करण्यासाठी रुपये १,३९,८३०/-इतका प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर खरेदी केंद्रीय संदर्भीय अन्न् प्रयोगशाळेकडील उपलब्ध निधीमधून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे,

**शासन निर्णय:**

आरोग्य सेवा संचालनालयाने वाचा क्र. १ नुसार दि ७.११.२०१९ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन निर्णय क्र.राआप्र-११/प्र.क्र.२१७/आरोग्य-३अ, दिनांक ३१.८.२०१२ अन्वये आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील प्रयोगशाळेत तपासणीसाठी येणा-या अन्न व पाणी नमुन्यातील तपासणीकरीता स्वीय प्रपंजी खात्यात जमा होणा-या रक्कमेपैकी २५ टक्के रक्कम वित्तीय अधिकार नियमावलीच्या तरतूदीच्या अधिन राहून प्रयोगशाळेसाठी आवश्यक असणारी साधन सामुग्री यासाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर अत्याधुनिक उपकरण आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे दिनांक १८.०१.२०१२ अन्वये (Messrs TEKEDYNE LEEMAN LABS या अमेरिकन उत्पादकाच्या अधिकृत पुरवठादाराकडून मे.लॅब इंडिया ॲनालिटीकल प्रा.लि. मुंबई या कंपनीकडून खरेदी करण्यात आली आहे. सदर उपकरणांचे सुटे भाग उक्त उत्पादक उत्पादीत करत असल्याने ते एकलस्रोत खरेदी आहे. त्यानुसार महाराष्ट्र शासन उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भाखंस-२०१४/प्र.क.८२/भाग-२ /उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मधील मुद्दा क्र. ३.२.६ नुसार एकलस्रोत तत्वावर Inductively Coupled Plasma Spectophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरण दुरुस्तीसाठी सुटे भाग खरेदीस रक्कम रुपये १,३९,८३०/-इतक्या खर्चास सर्व करांसहीत राज्याच्या स्वीय प्रपंजी खात्यामधुन खर्च भागविण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी-:**

१) सदर साहित्या सामुग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या दुरुस्तीसाठी खरेदीसाठी करण्यात यावी.व खरेदी करावयाच्या साहित्याचे विनिर्देश तांत्रिक समितीने मान्य केल्याप्रमाणे मागणीपत्रात नमूद करण्याची कार्यक्रम प्रमुखांनी दक्षता घ्यावी.

२) सदरहू बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्यता दिलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. या बाबींची खरेदी करण्यात यावी.संबधीत अधिकारी याबाबत जबादार असतील.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय

विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा खरेदी झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management ) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

६) निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

७) सदर खर्चास केंद्रीय/संदर्भीय अन्न् प्रयोगशाळेकडील उपलब्ध् निधीमधून भागविण्यात यावा,

८) सदर बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) सदर एकलस्त्रोत खरेदीस विभाग प्रमुखांची सहमती आहे.

११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०१५१८३६६०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.04.24 12:59:14 +05'30'

**(ज.स.तडवी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२. व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम),
५. आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२. अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे / रत्नागिरी / पुणे / नागपूर
१३. निवडनस्ती (आरोग्य-८)